**वनविभागाचे संगणकीकरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएससी -२००४/ प्र.क.२१(भाग-३)/ फ-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीखः ०४ ऑगस्ट, २०१४

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२९.१०.२०१०
२) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग, एमएससी - २००४/ प्र.क.२१ / फ-२ दि.२४.०८.२०११.
३) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग, एमएससी - २००४ / प्र.क.२१ / फ-२ दि.०५.१०.२०११.

प्रस्तावना :-

राज्याच्या संपूर्ण वनविभागात संगणकीकरणाचा प्रकल्प राबविण्याचा निर्णय संदर्भ क्र.३ वरील दि.०५.१०.२०११ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला असून सदर प्रकल्प नागपूर मुख्यालय तसेच वनविभागाचे सर्व क्षेत्रीय अधिकारी, वनक्षेत्रपाल व वनरक्षकांपर्यंत राबविण्यात येणार आहे. त्याअनुषंगाने वनविभागाचा संगणकीकरणाचा प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी दि.०५.१०.२०११ च्या शासन निर्णयान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण) यांच्या अध्यक्षेतेखाली प्रकल्प व्यवस्थापन घटक समिती गठीत करण्यात आली आहे.

वनविभागाचे संगणकीकरण कार्यक्रम अमंलबजावणी संदर्भात विविध बाबींवर निर्णय घेण्यासाठी दि.२२.१२.२०११ रोजी मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली नागपूर येथे उच्चाधिकार, समितीची बैठक घेण्यात आली होती. सदरहू बैठकीमध्ये माहीती व तंत्रज्ञान विभागाने तयार केलेल्या PDA च्या Specification ला मंजुरी प्रदान करुन सदर Specification हे विंडोज (Windows) वर चालणारे असावेत असे ठरविले गेले आहे. तसेच KPMG ला प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्त करुन

एक पूर्ण वेळ सल्लागार नागपूर मुख्यालय येथे व दुसरा सल्लागार (अंशत:) मंत्रालय येथे ठेवण्याबाबत प्रामुख्याने निर्णय घेण्यात आला आहे.

संदर्भाधिन दि.०५.१०.२०११ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या विविध बाबींपैकी Server Farm Services, Application Development, Capacity Building व Digitization ह्या बाबी मध्य प्रदेश वन विभागाकडून कराव्यात असे आदेश देण्यात आले होते. तथापि, दिनांक ११.०४.२०१२ रोजी प्रधान सचिव (वने) आणि सचिव (माहिती तंत्रज्ञान) यांचे उपस्थितीत झालेल्या बैठकीत मध्यप्रदेश वनविभागाने विकसित केलेल्या आज्ञावली (Applications) या Window वर आधारित असल्याने त्या Android या Operating System वर Customized करणेबाबत निर्णय घेण्यात आला होता. तथापि, यास मध्य प्रदेश वन विभागाने असहमती दर्शविली आहे. त्यामुळे यापुढे विविध आज्ञावली (Applications) ह्या Open Source Platform वर विकसित करण्याचा निर्णय दि.११.०४.२०१२ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेला आहे.

संगणकीकरणाचा प्रकल्प राबविण्यासाठी शासन निर्णयान्वये गठीत प्रकल्प व्यवस्थापन घटक समितीच्या वेळोवेळी बैठका सुध्दा घेण्यात आल्या आहेत. PDA चे Technical Specifications अंतिम करणे तथा खरेदीच्या प्रक्रियेसंबंधी निर्णय घेण्याकरीता मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समितीची दि.१४.०६.२०१३ व दि.२१.०७.२०१४ रोजी अनुक्रमे ८१ वी व ९१ वी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदरहू बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार वन विभागाच्या संगणकीकरणासंदर्भात पुढीलप्रमाणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. **<u>स्वरुप व व्याप्ती</u> :**

**(अ)** वनविभागातील संगणकीकरणाच्या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी तसेच सुसूत्रीकरणासाठी वनविभागासाठी असलेल्या प्रकल्प अंमलबजावणी घटक समितीमध्ये घेतेलेल्या

निर्णयानुसार संपूर्ण आय.टी. प्रकल्प हा वनविभागाचे सर्व क्षेत्रिय अधिकारी, सर्व वनक्षेत्रपाल व सर्व वनरक्षकांपर्यंत राबविण्याचे आदेश देण्यात येत आहेत.

**(ब)** मध्य प्रदेश वनविभागाने असहमती दर्शविल्यामुळे विविध वानिकी प्रणाली NIC व्दारा विकसित केल्या जातील. त्याकरीता प्रकल्पाचे तांत्रिक सल्लागार KPMG हे संपूर्ण तांत्रिक आणि इतर आवश्यक सहकार्य करतील.

**(क)** वन विभागाच्या संगणकीकरणासंबधित विविध कामे खाली दर्शविलेल्या यंत्रणे / विभागामार्फत प्राध्यान्याने करण्यात यावीत व त्यासाठी लागणारा निधी संदर्भांकित दि.०५.१०.२०११ च्या शासन निर्णयान्वये रु.२५०७.२० लाख मंजूर निधीमधुन कॅम्पा, १३ वा वित्त आयोग, माहिती व तंत्रज्ञान विभाग तसेच योजनेत्तरच्या शिर्षामध्ये वेळोवेळी प्राप्त होणा-या अनुदानातून भागविण्यात यावे. त्यानुसार खालील विवरणात नमूद बाबींवर त्या पुढील यंत्रणेमार्फत आवश्यक ती कार्यवाही करण्याचे आदेश देण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | कामाचे विवरण | संबधित यंत्रणा/ विभाग |
|---|---|---|
| 1. | Server Farm Services | राष्ट्रीय सुचना केंद्र/ DIT/वन विभाग |
| 2. | Communication Network | भारत संचार निगम लिमीटेड. |
| 3. | Local Area Network | राष्ट्रीय सुचना केंद्र |
| 4. | Application Development | राष्ट्रीय सुचना केंद्र/केपीएमजी |
| 5. | Procurement of Computer | वनविभाग / राष्ट्रीय सुचना केंद्र |
| 6. | Capacity Building | वनविभाग / राष्ट्रीय सुचना केंद्र |
| 7. | Procurement of GIS Software | वनविभाग |

वरील कामांकरिता NIC व BSNL / MRSAC/ इतर केंद्र किंवा राज्य शासकीय विभाग व उपक्रमांसोबत करार / MOU करण्याचे अधिकार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अध्यक्षतेखालील प्रकल्प व्यवस्थापन घटक समितीस राहिल.

GIS / MIS / Mobile application Outsource करण्याचे अधिकार प्रकल्प व्यवस्थापन घटक समितीस राहिल.

**(ड)** सर्व वनपरिक्षेत्र अधिकारी, सर्व क्षेत्र सहायक/वनपाल व वनरक्षक/बिटरक्षक यांना प्राधान्याने PDA/Smart Phone द्यावीत. सदरहू PDA/Smart Phone हे Android based Platform वर आधारित असावेत. तसेच वानिकी क्षेत्राशी निगडीत विविध आज्ञावली त्यावर व्यवस्थितपणे कार्यान्वित व्हाव्यात व याबाबत आवश्यक Technical Specifications अंतिम करणे आणि खरेदीची प्रक्रीया राबविणेप्रकरणी दि.१४.०६.२०१३ व दि.२१.०७.२०१४ रोजी पार पडलेल्या अनुक्रमे ८१ व ९१ व्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत PDA च्या खरेदीसाठी खालीलप्रमाणे Technical Specifications ला मान्यता देण्यात आली.

| Sr. No | Features | | Minimum specifications |
|---|---|---|---|
| 1 | Key Components | Platform | Android OS, v4.0 (Ice Cream Sandwich) & above version |
| | | CPU | 1 GHz Minimum |
| | | RAM | 1 GB RAM minimum |
| | | GPS | Assisted GPS (A-GPS) |
| | | Expandable Memory | Micro SD Card Slot with 4GB Memory Card included |
| 2 | Network | 3G Network Support | Required |
| 3 | Display | Type | Capacitive Touch Screen |
| | | Size | Minimum 3.98 inches or larger |
| 4 | Data Transfer | GPRS, EDGE | Required |
| | | WLAN/ Wi-Fi | Required |
| | | Bluetooth | Required |
| | | USB | micro USB port |
| 5 | Rear Camera (Primary Camera) | Image Size | 3 Mega pixel or higher |
| | | Feature | Geo-tagging and time stamping |
| 6 | Cell Phone Body Protective Cover | Protective body cover or case made of hard plastic/rubber /silicone. | |

**(इ)** याबाबत, दि. ३१ ऑगस्ट, २०१३ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार विकेंद्रीकरणानुसार क्षेत्रिय कर्मचा-यांनी त्यांचे स्तरावर व्यक्तिश: PDA खरेदी करावेत, असे संपुर्ण राज्याकरीता एकुण ७००० PDA खरेदी करण्यात यावेत की ज्याच्या रकमेची परतफेड शासनाव्दारे करण्यात येईल. एका PDA ची कमाल किंमत एकूण रु. ८०००/- (सर्व करांसहीत) इतकी

असेल. PDA च्या उक्त रकमेची प्रतिपूर्ति २ समान हफ्त्यात करण्यात येईल तथापि संबंधित मुख्य वन संरक्षक यांनी संबंधीताने PDA खरेदी केल्याची तपासणी केल्याचे प्रमाणपत्र देणे बंधनकारक आहे.

**(ई)** PDA उपकरण हे Authorized Dealer कडूनच खरेदी केल्याची पावती आणि Warranty सहित घेतलेले असले पाहिजे. उक्त PDA हे उच्चाधिकार समितीने मंजूर केलेल्या तांत्रिक निकषांचेच असावेत.

**(फ)** संबंधित अधिकारी / कर्मचा-याची बदली झाल्यास त्याने खरेदी केलेला PDA त्याचेसोबत राहील. कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यास किंवा स्वेच्छा निवृत्ती घेतल्यास त्याचेकडे असलेला PDA वन विभागास परत करावा किंवा कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यास कर्मचा-याने त्यांचेकडे असलेला PDA उत्तराधिका-याकडे हस्तांतरित करावा किंवा स्वत:कडे ठेवायचा असल्यास, संगणक, प्रिंटर, लॅपटॉप, सर्व्हर व इतर आयटी उपकरणांचे आयुष्यमान (Life) ठरविणे व कालबाहय झालेल्या उपकरणांची विल्हेवाट लावणेबाबत सामान्य प्रशासन विभाग यांच्या शासन निर्णय क्र.मातंस/नस्ती-०७/प्र.क्र.८९/३९, दि.०१ ऑगस्ट, २०११ मध्ये नमूद अटी शर्तीस अनुलक्षून नियंत्रक अधिकारी यांनी कार्यवाही करून ते उपकरण संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेकडे सुपूर्द करावे. यासंदर्भात मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली दि.३१.०८.२०१३ रोजी पार पडलेल्या ८३ व्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत PDA चे आयुष्यमान (Life) हे ३ वर्षे इतके गृहीत धरण्यात आलेले आहे. त्यामुळे वरील शासन निर्णयानुसार PDA निर्लेखनाची कार्यवाही करण्यासाठी PDA चे आयुष्यमान (Life) हे ३ वर्षे इतके निश्चित करण्यात येत आहे.

**(ग)** PDA हरविल्यास संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून आवश्यक Technical Specification असलेले नवीन PDA खरेदी करण्यात येऊन यापूर्वी BSNL मार्फत देण्यात आलेला दूरध्वनी क्रमांक (Sim Card) पुन्हा प्राप्त करुन घ्यावा किंवा तसे शक्य नसल्यास PDA हरविलेल्या संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून PDA खरेदीची किंमत वसूल करण्यात यावी. तसेच PDA

खराब/नादुरुस्त झाल्यास सदरहू PDA च्या दुरूस्तीचा खर्चही संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून वसूल करण्यात येईल.

**(ह)** PDA खरेदी केलेले अधिकारी/कर्मचारी यांचेकडून PDA चा वापर सतत व नियमितपणे केला गेला पाहिजे. यासाठी PDA वापरणारे अधिकारी / कर्मचारी यांचेवर पर्यवेक्षण तसेच संनियंत्रण करण्याची जबाबदारी संबंधीत मुख्य वनसंरक्षक यांची राहिल.

**(ज)** वन विभागातील क्षेत्रीय अधिकारी / कर्मचा-यांकरिता PDA वर Bandwidth/Data Usage करिता BSNL च्या Prepaid CuG प्रतिमहिना निश्चित केलेल्या दराने या Plan ला मंजूरी प्रदान करण्यात येत आहे. दर किमान राहतील याबाबत वाटाघाटी (Negotiation) करण्याचे अधिकार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अध्यक्षतेखालील प्रकल्प व्यवस्थापन घटक समितीस राहिल. त्या अनुषंगाने BSNL ने पुढील आवश्यक कार्यवाही करावी. सदरहू PDA चे प्रत्येक महिन्याचे निश्चित केलेल्या दरापर्यंतचे बील विभागामार्फत अदा करण्यात येईल. परंतू PDA चे बील प्रतिमहिन्यास निश्चित केलेल्या दरा पेक्षा जास्त आल्यास त्यावरील रक्कम ही संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून वसुल करण्यात यावी व ही रक्कम वसुल करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखाची राहिल. दर वर्षी मासिक रक्कम १० % वाढ अनुज्ञेय राहिल. हयावरची वाढ मंजूर करण्याचे अधिकार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अध्यक्षतेखालील प्रकल्प व्यवस्थापन घटक समितीस राहिल.

**(झ)** PDA हाताळणा-या कर्मचा-यांनी त्यांचेकडे असलेल्या PDA वर वनगुन्हयांची माहिती वेळोवेळी भरावी तसेच PDA वर रोज एक छायाचित्र किंवा Patrolling Route चे Details Upload करावे. त्यासाठी NIC यांनी एक प्रणाली विकसित करून कर्मचा-यांकडे असलेल्या PDA मध्ये Installed करणेबाबत कार्यवाही करावी.

**(न)** मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली दि.३१.०८.२०१३ रोजी पार पडलेल्या ८३ व्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीच्या अनुषंगाने PDA हाताळणा-या अधिकारी/कर्मचारी याने PDA

चा योग्य प्रकारे उपयोग व वापर करण्याकरिता खालील Penalty Clauses प्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत :-

**1.** For the first month if no offence is recorded and no photos are uploaded through PDA, the user will be given a first time warning.

**2.** For the next month if above condition is not fulfilled, the penalty of the amount, MFD will be paying under BSNL CUG plan, will be imposed.

**3.** Even after the first penalty, if the user still does not use the PDA, following penalty will be deducted from his salary. (A+B)

**A :** Cost of Depreciation= Rs. 223(8000/36)
(Rs. 8000 Cost of PDA, 36 months-Surviving period of PDA)

**B :** Cost of BSNL CUG plan

Before reimbursement of amount, undertaking must be taken from the user having accepted the above penalty clauses.

**२. <u>अंमलबजावणी यंत्रणा</u> :**

**(अ)** महाराष्ट्र राज्य वन विभागाच्या संगणकीकरणाचा प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी खालीलप्रमाणे प्रकल्प व्यवस्थापन घटक समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| १. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर | - अध्यक्ष |
| २. मुख्य वनसंरक्षक (मानव संसाधन), महाराष्ट्र राज्य, नागपूर | - सदस्य |
| ३. मुख्य वनसंरक्षक (कार्यआयोजना), नागपूर | - सदस्य |
| ४. मुख्य वनसंरक्षक (मुल्यांकन) | - सदस्य |
| ५. मुख्य वनसंरक्षक (वनव्यवस्थापन- योजना व विकास) | - सदस्य |
| ६. माहिती व तंत्रज्ञान विभागाचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ७. सहसंचालक, कोषागार कार्यालय, नागपूर | - सदस्य |
| ८. भारत संचार निगम मर्या., नागपूर या विभागाचे प्रतिनिधी | - सदस्य |

९. राष्ट्रीय सुचना केंद्र, नागपूर या विभागाचे प्रतिनिधी - सदस्य

वरील सर्व सदस्य वनविभागाचे संगणकीकरण पुर्ण होईपर्यंत या कामास सर्वथा सहकार्य करतील.

**(ब)** वनविभागात संगणकीकरणाचा कार्यक्रम राबविण्यासाठी कुशल मनुष्य बळ निर्माण करणे गरजेचे आहे. याकरीता संगणकाचे उत्तम ज्ञान असलेले Computer Savvy लिपीक-नि-टंकलेखक या संवर्गातील साधारत: ३ कर्मचा-यांची नियुक्ती करण्यात यावी.

संगणकीकरण करण्यासाठी वेळोवेळी मंजूर करण्यात आलेला निधी मंजूर केलेल्या बाबींवर जसे, Server Farm Services, Communication Network, Procurement of Computers, PDA and Accessories, Application Development, Capacity Building, इत्यादी बाबींवर खर्च करण्याचा अधिकार प्रकल्प व्यवस्थापन घटक समितीस राहील.

सदरचा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या आणि वित्त विभागाच्या सहमतीने तसेच उच्चाधिकार समितीने ९१ व्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०४१६१४०८७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nandkumar Maruti Shilwant

Digitally signed by Nandkumar Maruti Shilwant
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nandkumar Maruti Shilwant
Date: 2014.08.04 16:18:52 +05'30'

**(नं.मा.शिलवंत)**
उप सचिव,महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वन विकास महामंडळ, रॉवेल प्लाझा, कडबी चौक, नागपूर.

४) महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर

६) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक / मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक/ उपवनसंरक्षक.

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

९) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१२) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२

१३) संचालक, एम.आर.एस.सी.नागपूर.

१४) स्टेट इन्फोर्मेटीक ऑफीसर, नॅशनल इन्फोर्मेटीक सेंटर, ११ वा मजला नविन प्रशासकीय भवन, मंत्रालयसमोर, मुंबई-३२.

१५) व्यवस्थापकीय संचालक, भारत संचार निगम लिमिटेड, मुंबई.

१६) सह संचालक, कोषागार कार्यालय, नागपूर.

१७) राष्ट्रीय सूचना केंद्र, नागपूर.

१८) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव

१९) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव

२०) प्रधान सचिव (वने), यांचे स्वीय सहायक

२१) वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२२) निवडनस्ती/फ-२ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.